**मुख्य अभियंता (विद्युत), सार्वजनिक बांधकाम विभाग, मुंबई यांच्या अधिपत्याखालील कार्यालयातील अधिकारी/ कर्मचारी यांच्याकरीता निर्माण करण्यात आलेल्या अधिसंख्य पदास मुदतवाढ देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन निर्णय क्र. ईएसटी-२०२१/प्र.क्र.८७/प्रशासन-१**
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२**
**दिनांक :- १२ ऑगस्ट, २०२४.**

**संदर्भ** : १) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र. बीसीसी -२०१८/ प्र.क्र.३०८/१६-ब, दि.२१ डिसेंबर, २०१९

२) सार्वजनिक बांधकाम विभाग, शासन निर्णय क्र. ईएसटी-२०१९/प्र.क्र.९५/प्रशा-१, दि.२२ एप्रिल, २०२१

३) सार्वजनिक बांधकाम विभाग, शासन निर्णय समक्रमाक दि.१४ डिसेंबर,२०२१, दि. १४ नोव्हेंबर, २०२२, दि. ०८ नोव्हेंबर, २०२३

४) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र. बीसीसी -२०२०/ प्र.क्र.१८७ अे/१६-ब, दि.३० जून, २०२०

५) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र. बीसीसी २०१९/ प्र.क्र.५८१ ए/ १६-ब दि.१४ डिसेंबर, २०२२

६) अधीक्षक अभियंता (विद्युत), सार्वजनिक बांधकाम विभाग, मुंबई यांचे क्र.अ.अ.(वि)मुं/समन्वय/का-१(१)/१४६/२०२४, दि.१० जुलै, २०२४ रोजीचे पत्र.

**प्रस्तावना :-**

मुख्य अभियंता (विद्युत), सार्वजनिक बांधकाम विभाग, मुंबई यांच्या अधिपत्याखालील कार्यालयांतर्गत कार्यरत असलेल्या अधिकारी/कर्मचारी यांनी अनुसुचित जमातीचे जात वैधता प्रमाणपत्र विहित मुदतीत सादर न केल्यामुळे / अनुसुचित जमातीचे जात प्रमाणपत्र अवैध ठरल्यामुळे त्यांच्याकरीता अधिसंख्य पदे निर्माण करुन ११ महिने किंवा सदर कर्मचारी सेवेत राहिले असते तर ते ज्या दिनांकाला सेवानिवृत्त झाले असते त्या दिनांकापर्यंत मुदतवाढ देण्यात आलेली आहे. अधिसंख्य पदाची मुदत दि.०१ ऑगस्ट, २०२४ रोजी संपुष्टात आल्यामुळे सदर अधिसंख्य पदास मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

मुख्य अभियंता (विद्युत), सार्वजनिक बांधकाम विभाग, मुंबई यांच्या अधिपत्याखालील कार्यालयात कार्यरत असलेल्या खालील नमूद प्रपत्र-अ व प्रपत्र-ब मधील अधिकारी/कर्मचारी यांना सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय, दि.१४ डिसेंबर, २०२२ मधील अनु क्र.२ नुसार ०१ दिवसाचा तांत्रिक खंड देऊन दि. ०३ ऑगस्ट, २०२४ पासून दि.०२ जुलै, २०२५ पर्यंत ११ महिन्यांच्या कालावधीकरीता किंवा त्यांच्या सेवानिवृत्तीच्या दिनांकापर्यंत यापैकी जे आधी घडेल तोपर्यंत मुदतवाढ देण्यात येत आहे.

मुख्य अभियंता (विद्युत), मुंबई अंतर्गत अनुसूचित जमातीचे **जात वैधता प्रमाणपत्र सादर न केल्याच्या कारणास्तव** खालील अधिकारी/ कर्मचारी यांच्यासाठी अधिसंख्य पदे निर्माण करण्यात आली आहेत. **(प्रपत्र-अ)**

| **अ.क्र.** | **अधिकारी / कर्मचाऱ्याचे नाव** | **पदनाम** | **नियुक्तीचा दिनांक** | **सेवानिवृत्तीचा दिनांक** | **सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय, दि. १४/१२/२०२२ नुसार मुदतवाढीचा कालावधी** |
|---|---|---|---|---|---|
| १ | श्री.सतिश रामभाऊ वाघ | शाखा अभियंता | २६ डिसेंबर, १९८९ | ३१ डिसेंबर, २०२७ | दि.०३ ऑगस्ट, २०२४ ते दि.०२ जुलै, २०२५ |
| २ | श्री.रविंद्र विठ्ठल काटवे | तारतंत्री | १४ डिसेंबर, १९८९ | ३० जून, २०२७ | |
| ३ | श्री.हरिश्चंद्र दौलत बुरडे | कनिष्ठ लिपिक | २९ जुलै, १९९१ | ३० सप्टेंबर, २०२५ | |
| ४ | श्री.सुंदर महादेव होके | कनिष्ठ लिपिक | ०३ जानेवारी, १९९६ | २९ फेब्रुवारी, २०२८ | |
| ५ | श्री.पांडुरंग गो. दोरकुळकर | पंपपरिचर | १६ जुलै, १९९० | ३१ मे, २०२८ | |
| ६ | श्री.नाना देवराम सोनवणे | मजदूर | ०९ ऑक्टोबर, १९९१ | ३१ मे, २०२५ | दि.०३ ऑगस्ट, २०२४ ते दि. ३१ मे, २०२५ |

मुख्य अभियंता (विद्युत), मुंबई अंतर्गत खालील अधिकारी/कर्मचारी यांनी अनुसूचित जमातीचे जात **वैधता प्रमाणपत्र सादर न केल्याच्या कारणास्तव यापूर्वी सेवा समाप्त करण्यात आल्याने** त्यांच्यासाठी निर्माण करण्यात आलेली अधिसंख्य पदे. **(प्रपत्र-ब)**

| **अ. क्र.** | **अधिकारी / कर्मचाऱ्याचे नाव** | **पदनाम** | **नियुक्तीचा दिनांक** | **सेवानिवृत्तीचा दिनांक** | **सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय, दि. १४/१२/२०२२ नुसार मुदतवाढीचा कालावधी** |
|---|---|---|---|---|---|
| १ | श्री.अवधूत ज्ञानेश्वर लडगे | कनिष्ठ अभियंता | १९ डिसेंबर, २००३ | ३० सप्टेंबर, २०३८ | दि.०३ ऑगस्ट, २०२४ ते दि.०२ जुलै, २०२५ |
| २ | श्री.अजय राजेश्वर नंदनवार | मजदूर | १७ मे, २००३ | ३० जून, २०३७ | |

**२.** वर नमूद अधिकारी/कर्मचारी सद्य:स्थितीत मुख्य अभियंता (विद्युत), सार्वजनिक बांधकाम विभाग, मुंबई यांच्या अधिपत्याखालील कार्यालयात कार्यरत असल्याने त्यांच्या वेतनावर होणारा खर्च त्या कार्यालयाच्या वेतनासंबंधिच्या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा आणि संबंधित वित्तीय वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

**३.** श्री.विनोद खुशालराव वरुडकर, सहाय्यक अभियंता श्रेणी-२ (विद्युत), यांना दि. ०१ एप्रिल, २०२४ पासून शासन सेवेतून स्वेच्छा सेवानिवृत्त होण्यास मंजुरी देण्यात आली आहे. यास्तव त्यांच्या साठी निर्माण करण्यात आलेले अधिसंख्य पद या आदेशान्वये रद्द करण्यात येत आहे.

**४.** अधिसंख्य पदावर मुदतवाढ देण्यात आलेल्या अधिकारी/कर्मचारी यांच्या अधिसंख्य पदाची मुदत संपुष्टात आल्यानंतर किमान १५ दिवसात मुदतवाढीचा प्रस्ताव शासनास सादर करण्याची दक्षता मुख्य अभियंता (विद्युत), सार्वजनिक बांधकाम विभाग, मुंबई कार्यालयाने घ्यावी.

**५.** सदर शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभागाच्या क्रमांक बीसीसी २०१८/ प्र.क्र.३०८/१६-ब, दि.२१ डिसेंबर, २०१९ व क्रमांक बीसीसी -२०२०/ प्र.क्र.१८७ अे/१६-ब, दि.३० जून, २०२० तसेच क्रमांक बीसीसी २०१९/ प्र.क्र.५८१ ए/१६-ब, दि.१४ डिसेंबर, २०२२ या शासन निर्णयातील तरतुदीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

**६.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२४०८१२१२३८०९२३१८ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SUDEEP SAHADEO
REWALE

Digitally signed by SUDEEP SAHADEO REWALE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC WORKS DEPARTMENT,
2.5.4.20=41570e676233403355caab8cc6f4cb08480e2e80c6afc2b733ca211905e1d434, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=B5B2DA9CB10BA8C6D55247B5E56FE2206FFE50CB862E223A178F18C4C5BF7C34, cn=SUDEEP SAHADEO REWALE
Date: 2024.08.12 12:53:03 +05'30'

**( सुदिप सहदेव रेवाळे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति:-** मुख्य अभियंता (विद्युत), सार्वजनिक बांधकाम विभाग, मर्झबान पथ, फोर्ट, मुंबई-४००००१.

**प्रत :-** १) अपर मुख्य सचिव (सा.बां.) / सचिव (रस्ते) / सचिव (बांधकामे) यांचे स्वीय सहायक, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई-४००० ३२.
२) प्रधान महालेखापाल (लेखापरीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
३) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
४) महालेखाकार (लेखा व हकदारी)-II , महाराष्ट्र राज्य, नागपूर.
५) अधिदान व लेखा अधिकारी, वान्द्रे (पूर्व), मुंबई.
६) कार्यासन सेवा-३ / सेवा-४ सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२.
७) निवडनस्ती.